## ‘जलयुक्त’मध्ये पानवडीची जिल्ह्यात बाजी

जलयुक्त शिवार अभियानांतर्गत उत्कृष्ट कार्य पुरस्कारासाठी जिल्ह्यातून पानवडी (ता. पुरंदर) गावाने बाजी मारली आहे. प्रथम क्रमांकाच्या पुरस्कारात गावाला सन्मानचिन्हासह एक लाख रुपयांचा धनादेश मिळणार आहे. या शिवाय विभाग आणि राज्यस्तरीय स्पर्धेतही गाव पोचले आहे.

पानवडीला परीक्षण पाहणीत जिल्हा समितीकडून दोनशेपैकी १९४ गुण मिळाले होते.

पानवडी गावात पश्चिम घाट विकास योजना, एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन आणि इतर योजनेअंतर्गत झालेल्या कामामुळे ३२५.२५ टीसीएम पाणी अडविण्यात आले. जलयुक्त अभियानातून २१७.१० टीसीएम असे एकूण ५४२.३५ टीसीएम पाणी अडविण्याची क्षमता गावात निर्माण झाली.

या कामांमुळे यंदा पाऊस कमी होऊनही विहिरींच्या पाणीपातळीत दोन मीटरने वाढ झाली.

## भास्कर समुहाचे अध्यक्ष रमेश अग्रवाल यांचे निधन

दैनिक भास्कर समुहाचे अध्यक्ष रमेश अग्रवाल (वय ७३) यांचे आज (बुधवार) सकाळी हृदय विकाराच्या झटक्याने निधन झाले.

आज सकाळी अकरा वाजता दिल्लीहून अहमदाबादला पोहचल्यानंतर त्यांना हृदयाचा तीव्र झटका आला. त्यांना अपोलो रुग्णालयात नेण्यात आले. मात्र, तोपर्यंत त्यांची प्राणज्योत मालविली.

अग्रवाल यांच्या निधनानंतर भाजप, काँग्रेसच्या नेत्यांकडून त्यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. तर, गुजरातचे मुख्यमंत्री विजय रुपाणी यांनी त्यांच्या पार्थिवाचे दर्शन घेतले.

## जागतिक क्रमवारीत साक्षी पाचव्या स्थानावर

रिओ ऑलिंपिक ब्रॉंझपदक विजेती साक्षी मलिक आणि आशियातील अव्वल क्रमांकाचा मल्ल संदीप तोमर यांनी जागतिक कुस्ती क्रमवारीत पहिल्या दहा खेळाडूंत स्थान मिळवले आहे. साक्षी पाचव्या, तर संदीप सातव्या स्थानी आहे.



साक्षीने रिओ ऑलिंपिक स्पर्धेत ५८ किलो गटात ब्रॉझपदक जिंकले होते. संदीपला पुरुष विभागात ५७ किलो गटात सातवे स्थान आहे. १३ महिलांसह एकूण २४ आंतरराष्ट्रीय फ्रीस्टाइल मल्ल पहिल्या दहा खेळाडूंत आहेत.

ऑलिंपिक आणि युरोपियन विजेता जॉर्जियाचा व्लादिमीर खिंचेगाशेविली (५८ किलो), रशियाचा विश्वविजेता मगोमेद कुर्बानिलेव (७० किलो) आणि कॅनडाची ऑलिंपिक विजेती एरिका वेब (महिला ५७ किलो) आपापल्या गटात अव्वल स्थानी आहेत.

## हरभजन सिंग चॅम्पियन्स ट्रॉफी २०१७ सदिच्छादूतपदी निवड

भारतीय स्पिनर हरभजन सिंग याची चॅम्पियन्स ट्रॉफी २०१७ चा सदिच्छादूत म्हणून निवड करण्यात आली आहे. आंतरराष्ट्रीय क्रिकेट परिषद अर्थात आयसीसीकडून ही घोषणा करण्यात आली आहे.

चॅम्पियन्स ट्रॉफी २०१७ साठी एकूण आठ क्रिकेटपटूंची सदिच्छादूत म्हणून निवड करण्यात आली असून यामध्ये हरभजन सिंगचा समावेश आहे. यंदाची आयसीसी चॅम्पियन्स ट्रॉफी स्पर्धा १ जून ते १८ जूनदरम्यान पार पडणार आहे.

चॅम्पियन्स ट्रॉफीच्या आठ सदिच्छादूतांमध्ये हरभजन सिंग याच्यासोबत पाकिस्तानचा शाहिद आफ्रिदी, बांगलादेशचा हबिबूल बशर, इंग्लंडचा इयान बेल, न्यूझीलंडचा शेन बॉण्ड, ऑस्ट्रेलियाचा माईक हसी, श्रीलंकेचा कुमार संगकारा आणि दक्षिण आफ्रिकेचा ग्रॅमी स्थिम यांचा समावेश आहे.

## भारत खरेदी करणार इस्राईलकडून क्षेपणास्त्रे

पंतप्रधान नरेंद्र मोदी जुलैमध्ये इस्राईलच्या दौऱ्यावर जात असून, द्विपक्षीय संबंध दृढ करण्यासाठी भारत इस्राईलशी दोन संरक्षण करार करणार आहेत. यात रणगाडाविरोधी क्षेपणास्त्रे, नौदल हवाई संरक्षण क्षेपणास्त्रे अशा ८००० क्षेपणास्त्रांच्या खरेदीचा समावेश आहे.

सूत्रांनी दिलेल्या माहितीनुसार, इस्रायलच्या लष्करी हार्डवेअरचा भारत सर्वांत मोठा खरेदीदार देश आहे. दोन्ही देशांना बाह्य दहशतवादाचा धोका आहे. तसेच, अमेरिका आणि इस्राईलचे मैत्रीपूर्ण संबंध लक्षात घेता मोदी इस्रायलशी संबंध वाढविण्यावर भर देत आहेत.

भारत इस्राईलकडून रणगाडाविरोधी क्षेपणास्त्र 'स्पाइक' आणि नौदलासाठी हवाई संरक्षण क्षेपणास्त्र 'बराक-८'ची खरेदी करणार आहे. पुढील दोन महिन्यांत हे करार पूर्णत्वास जाण्याची शक्यता आहे. या दोन्ही करारांची किंमत सुमारे १.५ अब्ज डॉलर असेल. हा करार झाल्यानंतर दोन वर्षांनी भारताला इस्राईलकडून ८००० क्षेपणास्त्र मिळतील.

गेल्या आठवड्यात भारताने मध्यम आणि लांब पल्ल्याच्या जमिनीवरून हवेत मारा करणाऱ्या क्षेपणास्त्रांच्या खरेदीसाठी इस्रायलशी २ अब्ज डॉलरचा करार केला आहे. पाकिस्तान आणि चीन या शेजारी देशांशी तणाव वाढत असल्याच्या पार्श्वभूमीवर मोदी यांनी संरक्षण दलांच्या आधुनिकीकरणासाठी २०२५ पर्यंत २५० अब्ज डॉलर खर्च करण्याची योजना आखली आहे.

## मानवी मोहिमेसाठी भारताचे एक पाऊल पुढे

गेल्या दहा वर्षांहूनही अधिक काळ ज्या स्वप्नवत अशा मानवी अवकाश मोहिमेची स्वप्ने एकविसाव्या शतकातील महत्त्वाकांक्षी भारताला पडत आहेत, त्या मानवी अवकाश मोहिमेच्या दृष्टीने आपण नुकतेच एक पाऊल पुढे टाकले आहे.

प्रत्यक्षात जरी येत्या काही वर्षांनी 'इंडियन ह्युमन स्पेसफ्लाईट प्रोग्रॅम' कार्यान्वित होणार असला, तरी त्यासाठी आवश्यक असणाऱ्या किचकट तंत्रज्ञानापैकी एक अशा 'पॅड अॅबॉर्ट टेस्ट' या चाचणीचे पहिल्या टप्प्यावरील संशोधन नुकतेच यशस्वीपणे सुरू झाले आहे. भारतीय अवकाश संशोधन संस्थेतील (इस्रो) सूत्रांनी या कामगिरीविषयी माहिती दिली.

रशियाचे अंतराळवीर आणि अंतराळात प्रवास करणारे जगातील पहिले मानव ठरलेले युरी गागारीन यांनी पहिल्यांदा आपली अंतराळ सफर केली ती १९६१ मध्ये. ५६ वर्षांपूर्वी आजच्याच दिवशी ही सफर यशस्वीपणे पार पडली होती. त्यासाठी १२ एप्रिल हा दिवस 'इंटरनॅशनल डे ऑफ ह्युमन स्पेस फ्लाईट' म्हणून राष्ट्रसंघातर्फे साजरा केला जातो.